**कागल नगर परिषदेच्या विस्तारीत क्षेत्राचे नगर भूमापनाचे काम हाती घेण्याबाबत..**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सीटीएस ३८१०/प्र.क्र.७६/ल-१,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,
दिनांक : १४ जुलै, २०१०.

**शासन निर्णय :-**

कागल जि.कोल्हापूर येथील नगर भूमापन योजना सन १९६९ साली लागू झालेली आहे. कागल नगर भूमापन क्षेत्राबाहेर गावाची वाढ झालेली असल्याने नगर परिषदेने विस्तारीत क्षेत्रातील १२४८ मिळकतींची मोजणी करण्यासंदर्भात दि.१९.१.२००७ अन्वये उर्वरित क्षेत्राचे नगर भूमापन करण्याबाबत कागल नगर परिषदेने ठराव केला आहे.

२. कागल नगर परिषदेच्या विस्तारीत क्षेत्राची मोजणी करणेबाबतचा प्रस्ताव तालुका निरिक्षक भूमि अभिलेख, कागल यांनी सादर केला आहे. या प्रस्तावानुसार विस्तारित क्षेत्रात ५६.२४ हेक्टर क्षेत्राचा समावेश होत आहे. अंदाजे १२५० मिळकतींचे नगर भूमापनाचे काम करण्यासाठी रु.३१,०१,५२५/- (रुपये एकतीस लाख एक हजार पाचशे पंचेवीस फक्त) इतका खर्च होईल. तसेच, नगर भूमापनाचे दुर्बीण, सविस्तर मोजणी, चौकशी व सनद मिळकत पत्रिका लिहीणे या टप्प्याचे कामास अंदाजे १४ महिने इतका कालावधी लागण्याची शक्यता आहे. कागल नगर परिषदेने दि.२६.११.१९९५, दि.१७.२.२००१ व तसेच उपरोक्त दि.१९.१.२००७ रोजी ठराव मंजूर करुन कागल नगर परिषदेच्या विस्तारीत क्षेत्रास नगर भूमापन योजना लागू करण्यासाठी येणाऱ्या सर्व खर्चास मान्यता दिलेली आहे.

३. कागल नगर परिषदेच्या ठरावांच्या अनुषंगाने जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य यांनी वर नमूद केलेल्या विस्तारीत क्षेत्रातील नगर भूमापनासंबंधी सादर केलेला प्रस्ताव काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाचा साकल्याने विचार केल्यानंतर कागल नगर परिषदेच्या विस्तारीत क्षेत्रातील नगर भूमापनाचे काम हाती घेण्यास मंजुरी देण्याचा शासनाने आता निर्णय घेतला आहे.

४. वरील निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

अ) कागल नगर परिषदेच्या विस्तारीत क्षेत्राचे काम महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ७९ व १२६ अन्वये हाती घेण्यात यावे.

ब) उक्त कामासाठी लागणारे रु.३१,०१,५२५/- (रुपये एकतीस लाख एक हजार पाचशे पंचेवीस मात्र) या खर्चास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

क) सदर विस्तारीत क्षेत्राचे नगर भूमापनाचे काम विशेष उप अधीक्षक (गावठाण) गगनबावडा यांच्याकडून तर चौकशीचे काम उप अधीक्षक भूमि अभिलेख कागल यांच्याकडून करुन घेण्यात यावे.

ड) चौकशी कामासाठी नेमण्यात आलेल्या उप अधीक्षक भूमि अभिलेख कागल यांच्या निर्णयावर अपिल अधिकारी म्हणून जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख कोल्हापूर यांना अपिल अधिकारी या आदेशाद्वारे घोषित करण्यात येत आहे.

इ) सदर योजनेच्याअंमलबजावणीसाठी जिल्हा अधीक्षक भूमी अभिलेख कोल्हापूर यांना नियंत्रण अधिकारी म्हणून जाहिर करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१००७१५१४१६३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Sd /-
(माधव काळे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४ मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. नगराध्यक्ष, कागल नगर परिषद, कागल, जि.कोल्हापूर.
६. उप संचालक भूमि अभिलेख पुणे प्रदेश, पुणे.
७. जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख कोल्हापूर, कोल्हापूर,
८. उप अधीक्षक भूमि अभिलेख कागल, कागल, जि.कोल्हापूर.
९. मुख्याधिकारी, कागल नगर परिषद, कागल, जि.कोल्हापूर,
१०. निवडनस्ती ल-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.